राज्यातील कृषी व यंत्रमाग ग्राहक यांना वीज दरात सवलत दिल्यामुळे महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना द्यावयाचे अर्थसहाय्य (समायोजन) सन २०१९-२०

महाराष्ट्र शासन
ऊद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,
शासन निर्णय क्र.पूरमा-२०१९/प्र.क.३६/ऊर्जा-३
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २८ नोव्हेंबर, २०१९

<u>संदर्भ</u> :- १) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.४४/अर्थ-३,दि. १ एप्रिल, २०१९
२) वित्त विभाग शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१९/प्र.क्र.५२/अर्थ-३,दि. ८जुलै, २०१९
३) महावितरण कंपनीचे पत्र क्र. पी-कॅाम/लेखा/शासन/मागणी/सवलत,No.१९७२३ दि.१२ जुलै, २०१९.
४) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. निधिवी-२०१९/प्र.क्र.२७/ऊर्जा-३, दि.१३ जून, २०१९
५) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. निधिवी-२०१९/प्र.क्र.२७(१)/ऊर्जा-३, दि.१३ जून, २०१९
६) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. पूरमा-२०१९/प्र.क्र.३६/ऊर्जा-३, दि.२६ जुलै,२०१९.
७) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. पूरमा-२०१९/प्र.क्र.३६/ऊर्जा-३, दि. ६ ऑगस्ट,२०१९.
८) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग शासन निर्णय क्र. पूरमा-२०१९/प्र.क्र.३६/ऊर्जा-३, दि. ०५ नोव्हेंबर,२०१९.

<u>प्रस्तावना</u> :-

राज्यातील विविध वर्गातील ग्राहकांना शासनाच्या धोरणानुसार महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनीमार्फत वीज दरात सवलत देण्यात येते, व त्याची प्रतिपूर्ती शासनाकडून महावितरण कंपनीस केली जाते. मागणी क्रमांक के-६ मुख्य लेखाशिर्ष २८०१२६१५ या लेखाशीर्षाखाली सन २०१९-२० करिता रु.६७१०.०० कोटी इतक्या रकमेची पुरवणी मागणीसह तरतूद करण्यात आलेली आहे.

२. महावितरण कंपनीस एकूण अर्थसंकल्पिय तरतूद रु. ६७१० कोटीपैकी (मूळ अर्थसंकल्पिय तरतूद रु. ५२१० कोटी व जून २०१९ ची पुरवणी मागणी रु. १५०० कोटी) वित्त विभागाने संदर्भिय शासन परिपत्रक क्र. २ अन्वये निश्चित केलेली निधी वितरणाची ६०% ची मर्यादा शिथिल करुन महावितरण कंपनीस वीज दर सवलत या योजनेअंतर्गत ९७% पर्यंत निधी वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे.

३. वित्त विभागाने दिलेल्या निर्देशानुसार सन २०१९-२० या कालावधीतील विद्युत शुल्क व वीज विक्रीकरापोटी शासनास येणे असलेली रक्कम रू. १५१८ कोटी महावितरण कंपनीस पुस्तकी समायोजनाने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

कृषी ग्राहक व यंत्रमाग ग्राहक यांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वीज दरात दिलेल्या सवलतीसाठी महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना देय असलेली अर्थसहाय्याची रक्कम रु. १५१८,००,००,०००/-(रु. एक हजार पाचशे अठरा कोटी फक्त) समायोजनाने वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. वरील बाबीचा खर्च "मागणी क्रमांक के-६, मुख्यलेखाशिर्ष २८०१ वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००) (०१) कृषी विषयक व यंत्रमाग विषयक प्रशुल्क कमी करण्यासाठी वीज वितरण / पारेषण अनुज्ञप्तीधारकांना अर्थसहाय्य (२८०१२६१५) ३३ अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०१९-२० या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. समायोजनाने वितरीत करावयाची रक्कम रू. १५१८,००,००,०००/- (रु. एक हजार पाचशे अठरा कोटी फक्त) महावितरण कंपनीस रोख न देता पुढे दर्शविल्याप्रमाणे महावितरण कंपनीडून शासनास येणे असलेल्या विद्युत शुल्क व वीज विक्रीकरापोटी वसूल करण्यात यावी व खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली समायोजनाव्दारे जमा करण्यात यावी.

| अ. क्र. | तपशील | रक्कम रुपये | जमा लेखाशिर्ष |
|---|---|---|---|
| १) | वित्तीय वर्ष २०१९-२० या वर्षातील पहिल्या तिमाहीपोटी समायोजित करावयाची शिल्लक राहिलेली विद्युत शुल्काची रक्कम (एप्रिल,२०१९ ते जुलै,२०१९) | ३६७,६६,५८,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |
| २) | वित्तीय वर्ष २०१९-२० या वर्षातील दुस-या तिमाहीच्या अनुषंगाने विद्युत शुल्कापोटी येणे असलेली रु. १७६४.३९ कोटीपैकी रू. १०८४.२२७१ कोटी समायोजित कराण्यात येत आहे. व उर्वरित शिल्लक रक्कम रू. ६८०.१६२९ कोटी पुढील समायोजनाच्या वेळी समायोजित करण्यात येईल. | १०८४,२२,७१,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०१) मुंबई विद्युत शुल्क अधिनियम १९५८ खालील जमा रक्कमा (००४३००९२) |

| | | | |
|---|---|---|---|
| ३) | वित्तीय वर्ष २०१९-२० या वर्षातील दुस-या तिमाहीच्या अनुषंगाने महावितरण कंपनीच्या अहवालानुसार वीज विक्रीकराची रक्कम रू. ९४.७१ कोटी इतकी आहे. सन २०१९-२० या पहिल्या तीमाहीच्या कालावधीत मुख्य विद्युत निरिक्षकाच्या अहवालानुसार वीज विक्रीकराची रक्कम रू. १३४.२६२९ कोटी शासन निर्णय दि.६/८/२०१९ अन्वये समायोजित करण्यात आली होती. परंतू महावितरणच्या अहवालानुसार पहिल्या तीमाहीची वीज विक्रीकराची रक्कम रू. १०५.६६ कोटी इतकी आहे. त्यामुळे फरकाची रक्कम रू.२८.६०२९ कोटी (रू.९४.७१ कोटी वजा रू. २८.६०२९ कोटी=रू. ६६.१०७१ कोटी) रू. ६६.१०७१ कोटी समायोजित करण्यात येत आहे. | ६६,१०,७१,०००/- | ००४३ वीजेवरील कर व शुल्क १०१ वीजेचा वापर व विक्रीय यावरील कर (०१) (०३) महाराष्ट्र विजेच्या विक्रीवरील कर (००४३००८३) |
| | **एकूण** | **१५१८,००,००,०००/-** | |

४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१ मुंबई यांनी त्यांच्या अखत्यारित व अधिकारात वरील विवरणपत्रानुसार सदर रक्कम रू. १५१८,००,००,०००/- (रु. एक हजार पाचशे अठरा कोटी फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन तसे शासनास कळवावे.

५. सदर रक्कमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल, मुंबई यांच्या अखत्यारित व अधिकारात करण्यात येत असल्याने रू. १५१८,००,००,०००/- (रु. एक हजार पाचशे अठरा कोटी फक्त) सदर रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

६. महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांना उपरोक्त समायोजनाव्दारे वितरीत करावयाची रक्कम वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार समायजोनाने वितरीत करण्यात येत आहे.

७. प्रस्तुत प्रकरणी प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. वित्त विभागाच्या दि. ०८.०७.२०१९ च्या परिपत्रकातील सर्व अटींची व त्यासोबतच्या परिशिष्टातील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४१७/१४६१ दि.२७/०९/२०१९ तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १९६/१९/व्यय-१६, दि. ०५/११/२०१९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१९११२८१६४१३३९३१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Uddhav Dattatraya Walunj

Digitally signed by Uddhav Dattatraya Walunj
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IE and L(Energy), postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e52cab4406cc0eafdac51ee7f716de23ff575342e86fcb658bbfd2de90eba24, serialNumber=ae840efe87b5e7873901873f03909ccc9d960fc23d4e52ce892b102ca0cdd9e7, cn=Uddhav Dattatraya Walunj
Date: 2019.11.28 16:46:20 +05'30'

**( उ. द. वाळुंज )**

**सह सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचाल महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सूत्रधार कंपनी मर्यादित , हाँगकाँग बँक बिल्डिंग ,फोर्ट ,मुंबई.

२) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे मुंबई ४०००५१

३) सचिव महाराष्ट्र विद्युत नियामक आयोग १३ ,वा मजला, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कुलाबा, मुंबई १

४) मा .विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद /विधानसभा, विधानभवन, मुंबई ३२

५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई ४०००२०

७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर,

८) अधिदान व लेखा अधिकारी,रालेवि/अराप, मुंबई ४००००१

९) अधिदान व लेखा अधिकारी ,अधिदान व लेखा कार्यालय. वांद्रे पूर्व , मुंबई ४०००५१

१०) उप सचिव (ऊर्जा-५) ,उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२

११) वित्त विभाग, अर्थसंकल्प-१४, व्यय-१६, मंत्रालय, मुंबई-४०००३२

१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,३ रा मजला, प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर मुंबई.